संक्षिप्त देयक (एसी बिल) प्रलंबित असताना दुसऱ्या संक्षिप्त देयकावर रक्कम काढण्याची परवानगी मिळण्याबाबत.
हाफकिन बायो फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि.

# महाराष्ट्र शासन

## वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,

## शासन निर्णय क्रमांकः वैशिवि-२०१८/प्र.क्र.५२६/प्रशा-२

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल इमारत,
नवीन मंत्रालय, ९ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
दिनांक: ०३ जानेवारी, २०१९.

**वाचा: -**

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.खरेदी २०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दि.२६.०७.२०१७.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.मुंनिवि-२०१७/प्र.क्र.३८/२०१७/विनियम, दि.१८.१२.२०१७.
३) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.खरेदी २०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दि.०७.०३.२०१८.
४) सार्वजनिक आरोग्य विभाग, पत्र क्र.बैठक २०१८/प्र.क्र.१२१/सम-२, दि.१५.०९.२०१८ बैठकीचे इतिवृत्त (दि. ०१.०८.२०१८).

**शासन निर्णय: -**

या विभागाच्या अखत्यारीतील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रूग्णालय आणि आरोग्य संस्था यांना हाफकिन बायोफार्मास्युटीकल्स महामंडळ मर्या. मुंबई या संस्थेकडे औषधी व अनुषंगिक बाबींचे खरेदीसाठीचे अनुदान त्यांच्या बँक खात्यावर वर्ग करण्यासाठी कोषागारात देयके सादर करतांना मोठ्या प्रमाणात अडचणी येत असल्याची बाब संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन यांनी निदर्शनास आणली आहे. त्याकरीता हाफकिन बायोफार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि., मुंबई यांना संगणक सांकेतांक उपलब्ध करून देण्यात येईपर्यंत औषधे व तद्नुषंगिक बाबींच्या खरेदीसाठी निधी महामंडळाकडे वर्ग करताना अडचणी येऊ नयेत यासाठी कोषागाराकडे / अधिदान व लेखाधिकारी

कार्यालयाकडे संक्षिप्त देयक (AC Bill) प्रलंबित असताना दुसऱ्या संक्षिप्त देयकावर रक्कम काढण्यासाठी पर्यायी व्यवस्था होईपर्यंत विशेष बाब म्हणून याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

०२. उपरोक्त आदेश सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी राहतील.

०३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.६०७/२०१८/विनियम, दिनांक ०६.१२.२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२२१३१४१३८६१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIJAY GANGARAM SHINDE

Digitally signed by VIJAY GANGARAM SHINDE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=801b5b85203e25066f2fbe2425a7d6e6e2cac867a8a3758d1e90004fe700e2e3,
postalCode=400032,
street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=d0bdf210a179c76caf4d738bbaa80a1b32745f09e99a5865bca62ca44db92f61,
ou=MEDD, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VIJAY GANGARAM SHINDE
Date: 2019.02.05 18:30:57 +05'30'

**( विजय गं. शिंदे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. प्रधान सचिव (ले. व को.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. मा. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. मा.प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. मा. प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई
६. महालेखापाल (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
७. सर्व अधिष्ठाता, शासकीय महाविद्यालय व रूग्णालय.
८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१०.निवडनस्ती (प्रशासन-०२).